**नगरपरिषद सहायक अनुदान थेट नगरपरिषदांच्या बँक खात्यावर जमा करणेचे अधिकार प्रदान करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगरविकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-एमसीओ-२०१७/प्र.क्र.१९१/नवि-१४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:-१६.०६.२०१७.

**संदर्भ** :- १. शासन निर्णय क्र.-एमसीओ-२०१५/प्र.क्र.१७८/नवि-१४, दि.२३.१२.२०१५.
२. शासन निर्णय क्र.-एमसीओ-२०१६/प्र.क्र.९६/नवि-१४, दि.३१.०३.२०१७.
३. शासन निर्णय क्र.-एमसीओ-२०१७/प्र.क्र.१४७/नवि-१४, दि.०५.०५.२०१७.

**प्रस्तावना :-**

राज्यातील नगरपरिषदांचा जकात कर व महागाई भत्ता रद्द केल्यामुळे त्याऐवजी सदर नगरपरिषदांना सहायक अनुदान वितरीत करण्यात येते. सदर प्रयोजनार्थ वित्त विभागामार्फत सहायक अनुदान अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येते. नगरपालिकांना वितरीत होणारे सहायक अनुदान हे नगर परिषद प्रशासन संचालनालयास अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवरुन उपलब्ध करुन देण्यात येते. तद्नंतर संचालनालयाकडून संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडे व त्यांचेकडून सहायक अनुदानाचे देयक अधिदान व लेखा कार्यालयास सादर करण्यात येते व नंतर देयक पारित झाल्यावर ते त्या जिल्ह्यातील नगरपरिषदांच्या सहायक अनुदानाच्या बँक खात्यात थेट जमा करण्यात येते. या कार्यपद्धतीमुळे नगर परिषदांना सहायक अनुदान प्राप्त होण्यास विलंब होत असून परिणामत: नगर परिषद कर्मचा-यांचे वेतन व भत्ते वेळेवर अदा होत नसल्याची बाब निदर्शनास आली आहे. यास्तव, सदर सहायक अनुदान तातडीने संबंधित नगरपरिषदांना उपलब्ध होण्याच्या दृष्टीने अर्थसंकल्पिय वितरणप्रणालीद्वारे नगर परिषद संचालनालयाकडून थेट नगरपरिषदा/ नगरपंचायतीच्या बँक खात्यात थेट जमा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राज्यातील नगरपरिषदांचा जकात कर व महागाई भत्ता रद्द केल्यामुळे त्याऐवजी सदर नगरपरिषदांना सहायक अनुदान देण्यात येते. प्रत्येक वित्तीय वर्षात राज्यातील नगर परिषदांसाठी सहायक अनुदानाकरीता वितरण प्रणालीद्वारे प्राप्त झालेले अनुदान संबंधित नगर परिषद/ नगरपंचायत/ महानगरपालिका यांना वितरीत करण्याकरीता नगर परिषद प्रशासन संचालनालयाकडे वितरीत करण्यात येते. आता, नगरपालिकांना वितरीत होणारे सहायक अनुदान नगर परिषद प्रशासन संचालनालयाकडून थेट नगरपरिषदा /नगरपंचायतीच्या बँक खात्यात जमा करण्याचा निर्णय या शासन आदेशान्वये घेण्यात येत आहे. त्यानुसार आयुक्त तथा संचालक नगर परिषद प्रशासन यांनी आवश्यक कार्यवाही करावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२०१६४९३१३२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fdbaa1d64146913669652db09801ad2747641d9f84fcf576e55f7050a8df530d, cn=Jayasingrao N Patil
Date: 2017.06.20 16:45:54 +05'30'

**(ज.ना.पाटील)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
२. सर्व विभागीय आयुक्त.
३. सर्व जिल्हाधिकारी.
४. सर्व मुख्याधिकारी.
५. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
७. निवडनस्ती (नवि-१४) नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.